**<u>महाराष्ट्र शासन.</u>**

क्रमांक:-रजाम-३९११/प्र.क्र.४४०/आस्था-१२
ग्रामविकास व जलसंधारण विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ११ नोव्हेबर,२०११

प्रति, मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व)

विषय:- महाराष्ट्र जिल्हा परिषद मागासवर्गीय शिक्षक संघटनेच्या वतीने संपन्न होणाऱ्या राज्यव्यापी अधिवेशन व शिक्षण परिषदेसाठी विशेष रजा मंजूर होण्याबाबत.

महाराष्ट्र जिल्हा परिषद मागासवर्गीय शिक्षक संघटनेने दिनांक ६ ते १२ डिसेंबर,२०११ या कालावधीत नागपूर येथे राज्यव्यापी अधिवेशन व शिक्षण परिषद आयोजित केली आहे. सदर परिषदेसाठी उपस्थित राहाणाऱ्या जिल्हा परिषद शाळांतील शिक्षक/शिक्षण सेवक/मुख्याध्यापक/केंद्रप्रमुख यांना श्री.संजय परदेशी व इतर यांनी मा.उच्च न्यायालय औरंगाबाद खंडपीठामध्ये दाखल केलेल्या रिट याचिका क्र.१००/२००८ मधील निर्णयानुसार दिनांक ६ ते १२ डिसेंबर,२०११ अशी सात दिवसांची विशेष रजा मंजूर करता येणार नाही मात्र या कालावधीसाठी सर्वसाधारण रजा खालील अटीच्या अधीन राहून मंजूर करण्यास शासनाची परवानगी देण्यात येत आहे.

१) सदर अधिवेशनास उपस्थित राहाणाऱ्या कर्मचाऱ्यांना, त्यांना देय अनुज्ञेय असलेल्या रजेमधूनच ही रजा घेता येईल.

२) या अधिवेशनास उपस्थित राहण्यासाठी या सर्वसाधारण रजेचा फायदा घेणाऱ्या प्रतिनिधीना इतर संघटनेच्या अधिवेशनास उपस्थित राहण्याकरिता एक वर्षापर्यत यापुढे रजा मंजूर करता येणार नाही.

३) परिषदेस उपस्थित राहिल्यामुळे विदयार्थ्यांचा बाकी राहीलेला अभ्यास जादा तासिका घेऊन पूर्ण करण्यात यावा.

४) परिषदेस उपस्थित राहाण्यासाठी जाण्या-येण्याचा प्रवासखर्च शिक्षकांनी स्वत: करावा.

५) परिषदेच्या कालावधीत शाळेचे कामकाज सुरु असल्याबाबत योग्य ती खातरजमा संबंधित अधिकाऱ्यांनी केल्यानंतरच ही विशेष रजा मंजूर करण्यात यावी.

६) परिषदेस उपस्थित राहील्याबाबतचा दाखला रुजू होतेवेळी सादर करणे आवश्यक राहील.

७) जे शिक्षक/शिक्षणसेवक/मुख्याध्यापक/केंद्रप्रमुख सदर परिषदेस उपस्थित राहातील त्यांची रजा गट शिक्षणाधिकारी यांनी मंजूर करावी.

८) परिषदेसाठी उपस्थित राहील्याबाबत सेवापुस्तकात सदर रजेची नोंद घेण्यात यावी.

९) शाळेच्या नियमित कामकाजामध्ये कोणती बाधा येणार नाही याची दक्षता मुख्याध्यापक/केंद्रप्रमुख यांनी घ्यावी. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक क्र.२०१११११११५५०४८००१ असा आहे.

( रविंद्र पाटील )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) उपायुक्त (आस्था) विभागीय आयुक्त, कार्यालय (सर्व विभाग)

२) अध्यक्ष, महाराष्ट्र जिल्हा परिषद, मागासवर्गीय शिक्षक संघटना महाराष्ट्र राज्य, एस.एफ.दिपिका क्रिस्टल अरिहंत अर्पाटमेन्ट, रामबाग ले आऊट, मेडीकल चौक, नागपूर

३) निवड नस्ती (आस्था-१२)